**विदर्भ विकास कार्यक्रम सन २००९ अंतर्गत शेती पूरक व्यवसायासाठी कौशल्य विकास प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्यास सन २०११-१२ मध्ये मान्यता देणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**

**कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

शासन निर्णय क्रमांक : प्रशिक्षण- १४११/प्र.क्र.५०/३ अे

मंत्रालय विस्तार,मुंबई.४०० ०३२

**दिनांकः १८ जुलै,२०११**

**संदर्भ :**- १) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र.विविका-२००९/प्र.क्र.१०२/का.१४१५,दि. ३ फेब्रुवारी,२०१०

२) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्रमांक जा.क्र.विप्र-५/वि.वि.का.२००९-१०/१८८/२०११,दि.२२.२.२०११

**प्रस्तावना** :-

विदर्भाच्या विकासाची गती वाढविण्यासाठी त्या विभागात पायाभूत सुविधा निर्माण करणे,त्याचा दर्जा वाढविणे,शैक्षणिक व आरोग्यविषयक सुविधा निर्माण करणे तसेच सिंचन क्षमतेत वाढ करणे इ. बाबींना उपयुक्त ठरणा-या नविन योजना / बाबींचा विदर्भ विकास कार्यक्रम - २००९ विधान मंडळात जाहिर केला आहे. त्या अनुषंगाने विदर्भ विकास कार्यक्रम सन २००९ अंतर्गत सन २०११-१२ मध्ये ११ जिल्हयातील शेतक-यांसाठी शेतीपूरक व्यवसाय करण्यासाठी कौशल्य विकास प्रशिक्षण देवून शेतीची पर्यायाने शेतक-यांनी उत्पादकता वाढविणे अपेक्षित आहे.

सदरहू कार्यक्रम विदर्भातील ११ जिल्हयातील शेतक-यासाठी केवळ शेती उत्पन्नावर अवलंबून न रहाता आर्थिक उत्पन्न वाढीची एकूणच त्यांचे जीवनमान उंचावण्यासाठी तसेच शेतीपूरक व्यवसायासाठी कौशल्य वृध्दी प्रशिक्षण कार्यक्रम राबविणे अनिवार्य असल्याने सन २०११-१२ मध्ये प्रस्तुत प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

विदर्भ विकास कार्यक्रम-२००९ अंतर्गत शेतीपूरक व्यवसायासाठी कौशल्य विकास प्रशिक्षण कार्यक्रम या योजनेचा अंतर्भाव आहे. या योजनेअंतर्गत विदर्भातील अमरावती व नागपूर विभागातील ११ जिल्हयांमध्ये शेती पूरक व्यवसायासाठी कौशल्य विकास प्रशिक्षण देवून शेतक-यांची उत्पादकता वाढविण्याचे उध्दिष्ट विचारात घेवून कौशल्य विकास प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्यास शासनाची **प्रशासकीय** मान्यता देण्यात येत आहे.

सदरहू प्रशिक्षण कार्यक्रम डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ आणि वसंतराव नाईक राज्य कृषि व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,नागपूर यांच्या मार्फत राबविण्यात यावा. **तसेच संबंधित विद्यापीठाकडील कृषि विज्ञान केंद्र,स्वयंसेवा संस्थाकडील प्रशिक्षण केंद्र,कृषि चिकित्सालये त्याचबरोबर राष्ट्रीयकृत बॅंकाकडील प्रशिक्षण केंद्र व संलग्न विभागाकडील प्रशिक्षण केंद्रावर कृषि कौशल्य विकास प्रशिक्षण कार्यक्रम विदर्भातील ११ जिल्हयांमध्ये राबविण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. तथापि, सदरहू योजनेसाठी अर्थसंकल्पिय कार्यप्रणालीनुसार तरतूद उपलब्ध झाल्यानंतर या योजनेचा वित्तीय मान्यतेचा शासन निर्णय स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येईल.**

विदर्भ विकास कार्यक्रम-२००९ अंतर्गत सन २०११-१२ मध्ये विदर्भातील ११ जिल्हयात शेती कौशल्य शेती शाळा आयोजित करण्याकरीता खाली दर्शविलेल्या बाबींची अंमलबजावणी करण्यात यावी.

अ) वनामती /रामेती /कृषि विद्यापीठ स्तर

१. तज्ञ / सुलभकर्ते / नाविन्यपूर्ण यशस्वी शेतकरी यांचे कार्यशाळा (वनामती स्तर)

२. विभागीय स्तरावरील तज्ञ/सुलभकर्ते /नाविन्यपूर्ण यशस्वी शेतकरी यांचेसाठी कार्यशाळा (रामेती स्तर)

३. प्रचार प्रसिध्दी व डॉक्युमेंटेंशन

ब) राज्यस्तर संकीर्ण

कौशल्य आधारीत शेतीकौशल्य शेती शाळा

सन २०११-१२ मध्ये शेतीपूरक व्यवसायासाठी कौशल्य विकास प्रशिक्षण कार्यक्रमाची अंमलबजावणी करण्यासाठी संचालक (विस्तार व प्रशिक्षण ) यांना प्राधिकृत करण्यास येत असून त्यांनी या योजनेच्या मार्गदर्शक सूचना निर्गमित कराव्यात.

सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०११०७१८१०३२०७००१ असा आहे

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**(वीणा राऊत)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

कुलगुरु, सर्व कृषि विद्यापीठे
सचिव,(पदुम),कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,मंत्रालय,मुंबई
सचिव(मृद व जलसंधारण),ग्राम विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
सचिव,ग्राम विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
सर्व विभागीय आयुक्त
आयुक्त,कृषि,महाराष्ट्र राज्य,पुणे (५ जादा प्रतीसह)
आयुक्त,सहकार,महाराष्ट्र राज्य,पुणे
आयुक्त,पशुसंवर्धन,महाराष्ट्र राज्य,पुणे
आयुक्त,मत्स्यव्यवसाय,महाराष्ट्र राज्य,पुणे
आयुक्त,दुग्धव्यवसाय,वरळी,मुंबई,महाराष्ट राज्य
साखर आयुक्त,महाराष्ट्र राज्य,पुणे
सर्व जिल्हाधिकारी
सर्व जिल्हयांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
संचालक (विस्तार व प्रशिक्षण),तथा नोडल अधिकारी,कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे (५ जादा प्रतीसह)
सर्व संचालक / कृषि सहसंचालक,कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे
सर्व विभागीय कृषि सहसंचालक
संचालक,पणन,सहकार विभाग,महाराष्ट्र राज्य,पुणे
संचालक,(समाजकल्याण),महाराष्ट्र राज्य,पुणे
संचालक,रेशीम उदयोग,पुणे-मुंबई रस्ता,शासकीय दूध डेअरीसमोर,पुणे ४११००३
संचालक,सामाजिक वनीकरण,महाराष्ट्र राज्य,पुणे

संचालक,वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,नागपूर
सर्व प्राचार्य,विभागीय कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,पुणे /नागपूर /कोल्हापूर /अमरावती/औरंगाबाद/
नाशिक/खोपोली
सर्व जिल्हयांचे जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
महालेखापाल,महाराष्ट्र-१ (लेखा परीक्षा/ लेखा अनुज्ञेयता),मुंबई
महालेखापाल,महाराष्ट्र-२,(लेखा परीक्षा/लेखा अनुज्ञेयता ),नागपूर
माहिती व जनसंपर्क संचालनालय (५ प्रतीसह)
नियोजन विभाग / वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
मा.मंत्री(कृषि) यांचे खाजगी सचिव
मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
सर्व सहसचिव /उप सचिव (कृषि),कृषि व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई
निवड नस्ती (का.३ अे)